आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात कृषी विद्यापीठांना सहायक अनुदान योजनेंतर्गत वेतनासाठी निधी वितरण. (लेखाशीर्ष २४०१ ८२९१)

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/ प्र.क्र.०७/ कार्यासन-६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख : १६ मे, २०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३. दि.१.०४.२०२४.

२) कृषि विभागाची नस्ती क्र.कृषिवि-३७२३/प्र.क्र.८४/७-अे.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषि विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या कृषी विद्यापीठांना सहायक अनुदान या योजनेंतर्गत महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी अधिनस्त कृषि महाविद्यालय, नंदुरबार येथील कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठी संदर्भाधीन क्रमांक २ येथील नस्ती अन्वये प्रस्ताव प्राप्त झालेला आहे.

सन २०२४-२०२५ चा अंतरिम अर्थसंकल्प दिनांक २७ फेब्रुवारी, २०२४ रोजी विधानमंडळास सादर करण्यात आला असून "सन २०२४-२०२५ या वर्षाकरीता प्रस्तावित केलेल्या विनियोजनांची अनुसूची" या अर्थसंकल्पीय प्रकाशनातील "स्तंभ क्रमांक ५ व ६" यामध्ये विभागांना दर्शविलेल्या रकमांचे अर्थसंकल्प वितरण प्रणालीवरील (BEAMS) वितरण वित्त विभागामार्फत करण्यात आले आहे. या अनुषंगाने उपरोक्त प्रस्तावास अनुसरून कृषि विभागास कृषि महाविद्यालयनंदुरबार येथील , कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २४०१, पीक संवर्धन या खाली कृषी विद्यापीठांना सहायक अनुदान या योजनेंतर्गत बाब क्र. ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीखाली सन २०२४-२५ च्या आर्थिक वर्षाच्या तरतुदींतून खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| योजनेचे नांव व लेखाशीर्ष | बाब | सन २०२४-२५ अर्थसंकल्पीय तरतूद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|
| कृषी विद्यापीठांना सहायक अनुदान (२४०१ ८२९१) | ३६-सहायक अनुदाने (वेतन) | ४९६.८२ | ८२.८० |

२. उपरोक्तप्रमाणे एकूण रु.८२.८० लाख (अक्षरी रुपये ब्याऐंशी लाख ऐंशी हजार फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, कृषि विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील च्या शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन अ.क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५१६११३०४०८०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2024.05.16 18:25:32 +05'30'

**( किरण कि. पवार)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग